संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांच्या अधिपत्याखाली शिक्षकीय संवर्गातील (निदेशक) सरळ सेवा कोट्यातील ७०० रिक्त पदे भरण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण २०१७/प्र.क्र.२९१/१७/व्यशि-४,**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
दुसरा मजला, मुख्य इमारत, मंत्रालय, मुंबई.
दिनांक : २० जानेवारी, २०२२

वाचा :-

१) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण यांचे पत्र क्र. ४/आस्था-३/रिक्त पदे/२०१७/१३८१, दि. १७ नोव्हेंबर, २०१७
२) वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक : पदनि-०६१७/प्र.क्र.२०/आ.पु.क., दि. ०९ जून, २०१७
३) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण यांचे पत्र क्र. ४/आस्था-३/२०१९/शि.रिक्त पदे/७०७, दि. २५ जून, २०१९
४) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण यांचे पत्र क्र. ४/आस्था-३/२०१९/शि.रिक्त पदे/७०७, दि. ११ नोव्हेंबर, २०१९
५) वित्त विभाग यांचे पत्र क्रमांक : पदनि २०२०/प्र.क्र.०७/आपुक, दि. २७ फेब्रुवारी २०२० रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
६) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण यांचे पत्र क्र. व्यशिप्र-२०२१/आस्था-३/प्र.क्र.२५/पद भरणे/का.४/३१४, दि. २९.१२.२०२१
७) वित्त विभाग शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. २४ जून, २०२१

**प्रस्तावना:-**

व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनायातर्गत राज्यात एकुण ७३९६ नियमित शिक्षकीय पदे मंजूर असून त्यापैकी ५०३३ पदे भरलेली आहेत व २३६३ पदे रिक्त आहेत. तसेच कंत्राटी तत्वावरील १५०० शिक्षकीय पदे मंजूर असून त्यापैकी ३०९ पदे भरलेली व १०९१ पदे रिक्त आहेत. राज्यामध्ये मोठया प्रमाणात शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था असून त्यांची प्रशिक्षणार्थी प्रवेशक्षमता ९३४८१ इतकी आहे. सदर औद्योगिक प्रशिक्षण संस्थामधून राज्यातील आदिवासी, अल्पसंख्यांक, अनुसुचित जातीच्या मुलां-मुलींना व इतर घटकांतील युवक-युवतींना रोजगार/स्वयंरोजगारक्षम करण्यात येते. तसेच मा. पंतप्रधान यांनी जाहिर केलेल्या कौशल्य विकास कार्यक्रमानुसार निश्चित केलेले कुशल मनुष्यबळ निर्माण करून त्याव्दारे राज्याचे सकल उत्पन्न वाढविण्याचे ध्येय निश्चित करण्यात आले आहे. त्यादृष्टीने या औद्योगिक प्रशिक्षण संस्थांच्या माध्यमातून युवक-युवतींना विविध व्यवसायांचे प्रशिक्षण देण्यात येते. औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये शिकविण्यात येणारे अभ्यासक्रम हे व्यवसायाभिमुख असून जवळपास ७० टक्के प्रशिक्षण हे प्रात्यक्षिकाव्दारे देण्यात येते.

औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधील जास्त मागणी असलेल्या अभ्यासक्रमांची रिक्त पदे भरण्यासाठी अशा अभ्यासक्रमांसाठी असलेली यंत्रसामुग्रीची उपलब्धता, स्कील गॅप स्टडीच्या धोरणानुसार पदाची आवश्यकता इत्यादी बाबी विचारात घेवून, व्यवसाय निहाय गट निदेशक-४, शिल्प निदेशक-१०९७, गणित निदेशक-४०, चित्रकला निदेशक-३२, गणित तथा चित्रकला निदेशक-३० अशी सरळसेवेच्या कोटयातील एकूण १२०३ रिक्त पदे भरण्याचा प्रस्ताव वित्त विभागाच्या शासन निर्णय दि. ०९.०६.२०१७ अन्वये मा. अ.मु.स. (सेवा) यांच्या अध्यक्षतेखाली गठित केलेल्या उप समिती यांच्याकडे दि. २७ फेबुवारी, २०२० रोजी ठेवण्यात आले असता त्या उप समितीने १२०३ पदांपैकी प्रादेशिक कार्यालय मुंबई-१८७ , पुणे-१०८, नाशिक-१०१, औरंगाबाद-१०७, अमरावती-८५, नागपूर-११२ अशी एकूण ७०० शिक्षकीय संवर्गातील (निदेशक) सरळसेवा कोटयातील रिक्त पदे भरण्यास मंजूरी देण्यात आलेली आहे. त्यानुसार शिक्षकीय संवर्गातील (निदेशक) सरळसेवा कोटयातील ७०० रिक्त पदे भरण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांचे अधिपत्याखाली असलेल्या प्रादेशिक कार्यालयार्तगत शिक्षकीय संवर्गातील (निदेशक) १२०३ रिक्त पदांपैकी प्रादेशिक कार्यालय मुंबई-१८७ , पुणे-१०८, नाशिक-१०१, औरंगाबाद-१०७, अमरावती-८५, नागपूर-११२ अशी सरळसेवा कोटयातील एकूण ७०० रिक्त पदे भरण्यास संदर्भ क्र. २ अन्वये गठित केलेल्या मा. उप समितीने त्यांच्या दि. २७ फेब्रुवारी, २०२० रोजीच्या बैठकीत मान्यता दिलेली आहे. त्यानुसार शिक्षकीय संवर्गातील (निदेशक) सरळसेवा कोटयातील ७०० रिक्त पदे भरण्यास या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर पदावरील येणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात येवून सन २०२१-२२ या वर्षा करिता मंजूर असलेल्या अनुदानातून सदरचा खर्च भागविण्यात यावा.

अ) "मागणी क्रमांक झेडए २, २२३० कामगार व सेवायोजन, ०३ प्रशिक्षण, ००३ कारागिर व पर्यवेक्षक यांचे प्रशिक्षण, शासकीय औद्योगिक प्रशिक्षण, (०१) शासकीय औद्योगिक प्रशिक्षण कार्यशाळा, (०२)(०८) प्रवेश क्षमता वाढविण्यासाठी औद्योगिक प्रशिक्षण संस्थांचा विस्तार करणे (कार्यक्रम) २२३०ए२०९"

ब) "मागणी क्रमांक एन ३, २२२५ अनुसुचित जाती, अनुसूचीत जमाती इतर मागासवर्गीय वर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ०१ अनुसूचित जातीतील मुले (०१)(०४) अनुसूचित जातीतील मुले व मुली यांचेकरिता विभागीय स्तरावर औद्योगिक प्रशिक्षण संस्था सुरू करणे (अ.ज.घ.यो.) (कार्यक्रम) (२२२५४१०४)"

क) "मागणी क्रमांक झेडई १, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण ००, ०२ समाजकल्याण, २००, इतर कार्यक्रम (००)(१६) अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांसाठी विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये (आयटीआय) दुसरी व तिसरी पाळी सुरू करणे (कार्यक्रम) (२२३५ए ५३४)"

ड) "मागणी क्रमांक झेडए-२, २२३० कामगार व सेवायोजन, ०२ कारागीरांचे तांत्रिक व व्यावसायिक शिक्षण, (०२)(०१), कारागीरांचे तांत्रिक व व्यावसायिक प्रशिक्षण (अनिवार्य), ०१-वेतन (२२३०ए०३१),".

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौ. संदर्भ क्र. ६/व्यय-६ दि. १७ जानेवारी, २०२२ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार तसेच वित्त विभाग शासन निर्णय दि. ०९ जून, २०१७ व दि. २४ जून, २०२१ मधील तरतूदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०१२०१७५९१८८५०३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRABHAKAR A SANKHE

Digitally signed by PRABHAKAR A SANKHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILL DEVELOPMENT ENTREPRENEURSHIP AND EMPLOYMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1bac9385344f87e77e1084162b6716914d02e353160fac64808fec76c25d6d90, pseudonym=11AF006A9B8244D291C83FCA56E433781EE9E76C, serialNumber=2F853CAC13002D53D7034663C6F0D48D3ADE65B7222B4D38B6E5902DB13A4750, cn=PRABHAKAR A SANKHE
Date: 2022.01.20 18:01:15 +05'30'

**( प्रभाकर संखे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई, पुणे, नाशिक, औरंगाबाद,अमरावती, नागपूर. **(संचालनालयामार्फत)**
३. लेखा व कोषागार कार्यालय, मुंबई, पुणे, नाशिक, औरंगाबाद,अमरावती, नागपूर.
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
५. महालेखापाल (लेखा व परिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
६. वित्त विभाग/व्यय-६ मंत्रालय, मुंबई.
७. मा. मंत्री/राज्यमंत्री, कौ.वि.,रो व उद्यो. विभाग यांचे स्वीय सहायक.
८. मा. प्रधान सचिव, कौ.वि.,रो व उद्यो. विभाग यांचे स्वीय सहायक.
९. निवडनस्ती.